राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशी-नुसार मृत न्यायालयीन बंदीच्या अवलंबिताना रू. २५,०००/- [पंचवीस हजार] ची आर्थिक मदत मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएम-०१९७/२७[१३७]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ८ डिसेंबर १९९७.

वाचा:- राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-३६/१३[१६२]/ ९६-एलडी, दिनांक १२.८.९७.

श्रीयुत लक्ष्मण सोमनाथ वर्मा, यांना दि. ८.१.९६ पर्यंत शिक्षा झाली होती आणि त्यानंतर अन्य एका प्रकरणी न्यायालयीन बंदी म्हणून त्यांना कारागृहात ठेवण्यात आले होते. दि. ७.१२.९६ रोजी श्वसनक्रिया बंद पडून उल्हासनगर सेन्ट्रल हॉस्पिटलमध्ये मृत्यू आला. मृत्यूच्या समयी त्यांचे वय ३२ वर्षे होते. श्रीयुत वर्मा यांच्यावर आंतररूग्ण विभागात ताप आणि अतिसाराच्या कारणास्तव दि. १२.१०.९६ ते २८.१०.९६ पर्यंत आणि पुन्हा अतिसारा साठी दिनांक ३०.११.९६ ते ५.१२.९६ या कालावधीत उपचार करण्यात आले होते. दि. ५.१२.९६ रोजी त्यांना उल्हासनगर सेंट्रल हॉस्पिटलमध्ये पाठविण्यात आले आणि त्या ठिकाणी दि. ७.१२.९६ रोजी मृत्यू झाले. श्री. वर्मा हे उत्तर प्रदेशातून स्थलांतरीत मजूर होते आणि मृत्यूसमयी न्यायालयीन बंदी होते. त्यांची पत्नी आणि मूल त्यांच्या मृत्यूपूर्वीच वारलेले आहेत, आणि आता फक्त आईवडील जिवंत आहेत. त्यांच्या आईवडीलांचे वय पाहता राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली यांनी अशी शिफारस केली आहे की, मुलावर अवलंबून असलेल्या आईवडीलांना अनुकंपा आर्थिक मदत म्हणून अंतिरिमरित्या रू. २५,०००/- देण्यात यावेत. राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीप्रमाणे अवलंबिताना रू. २५,०००/- देणे आवश्यक आहे. [रू. पंचवीस हजार]

शासन निर्णय:- मृत श्री. वर्मा यांच्या आईवडीलांना रू. २५,०००/- एवढी मदत देणे शक्य व्हावे म्हणून रू. २५,०००/- [रू. पंचवीस हजार] एवढी रक्कम आकस्मिकता निधीतून अग्रीम म्हणून ह्या आदेशान्वये कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. ही रक्कम त्यांनी मृत श्री. वर्मा यांच्या आईवडीलांचा ठावठिकाणा शोधून दि. ३१.३.९८ पूर्वी अदा करावी.

२. वरीलप्रमाणे रू. २५,०००/- [पंचवीस हजार] एवढा होणारा खर्च मागणी क्र. ७ बी २०५६-तुरूंग-१०१ [दोन] जिल्हा तुरूंग-२७-इतर खर्च [२०५६००४४२७] या जमेतर भारित शीर्षाखाली टाकण्यात यावा व हा खर्च आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमातून भागविण्यात यावा. आकस्मिकता निधी, अग्रीमातून करावयाच्या

..२.

खर्चासंबंधी देयके काढताना या ८००००९५४
संगणक संकेतांकाचा वापर करावा. आकस्मिकता निधी अग्रिमाची परिपूर्ती करण्यासाठी पूर्ण रकमेची पूरक मागणी मार्च १९९८ अधिवेशनात रितसर सादर करण्यात येईल.

नियंत्रण अधिकाऱ्यांना असेही कळविण्यात येते की, त्यांनी आकस्मिकता निधी खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात अगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणाऱ्या देयकावर "आकस्मिकता" निधी अग्रिम शासन ज्ञापन वित्त विभाग, क्र. आकनि-११९७/०९५/ अर्थसंकल्प-११, दिनांक ८.१२.९७ अन्वये मंजूर असे लाल शाईने लिहावे." अशी स्पष्ट सूचना अंतर्भूत करावी व ही सूचनाही लाल शाईने अधोरेखीत करावी. तसेच आकस्मिकता निधीतून काढलेल्या अग्रिमातून करावयाच्या खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील प्रकरण-१६ मध्ये विशद केलेल्या नियमाची व वित्त विभाग परिपत्रक क्र. सीएनएफ/सीसलएफ-१०८३/१४०/अर्थसंकल्प-३, दिनांक २६ एप्रिल १९८३ व ज्ञापन परिपत्रक क्र. सीएनएफ-१०८६/१५३/अर्थसंकल्पीय-३, दिनांक २८.५.८६ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच अग्रिमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकत्रित माहिती त्यांनी त्या महिन्यानंतर १५ तारखेपर्यंत वित्त विभागास [अर्थसंकल्प-३] मंत्रालय, मुंबई यांना पाठवावी, व त्याची एक प्रत सचिव, गृह विभाग यांजकडे पाठविण्यात यावी.

हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-६५०/९७/व्यय-८, दि. १६.१०.९७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ सी. श्री. चौधरी ]
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय] पुणे/पश्चिम विभाग, पुणे/मध्य विभाग औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर/दक्षिण विभाग, मुंबई.
महालेखापाल-१/२ [लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा] मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
कोषागार अधिकारी, पुणे.
महसंचालक, लेखा व कोषागारे.
संगणक कक्ष, नवीनप्रशासन भवन , ५ वा माळा, मुंबई.
वित्त विभाग [व्यय-८/अर्थसंकल्प-३/१०].
गृह विभाग, पोयुडी-१.
निवडनस्ती.